पुणे तसेच पिंपरी-चिंचवड शहर सीसीटीव्ही प्रकल्पाबाबत चौथ्या तिमाही हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-०८१५/प्र.क्र.२७/भाग-१/पोल-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक: १७ नोव्हेंबर, २०१६.

**वाचा :**

१) शासनाचे क्रमांक आयएसएस-१०१२/प्र.क्र.७१/विशा-४,दि.१७.९.२०१३ चे हेतू पत्र (Letter of Intent)

२) शासन निर्णय, गृह विभाग क्र. आयएसएस-१०१२/प्र.क्र.७१/विशा-४, दि. १४.१०.२०१३.

३) महाराष्ट्र शासन आणि मे. अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. यांचे दरम्यान दि.२८.१०.२०१३ रोजी झालेला करारनामा.

४) संचालक, अलाईड डिजिटल यांचे दि.२६.१०.२०१६ रोजीचे पत्र.

५) शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६

६) शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र. क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५

७) मे. प्राईसवॉटरहाऊस कूपर्स कं. यांचा दि. ८.११.२०१६ रोजीचा ई-मेल.

**प्रस्तावना :**

पोलीस आयुक्त, पुणे यांचे अधिनस्त, पुणे व पिंपरी-चिंचवड शहरांमध्ये सीसीटीव्ही बसविण्याबाबत मे.अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. कंपनीला दि. १७.९.२०१३ रोजी Letter of Intent देण्यात आले होते. संदर्भाधीन क्र. २ येथे नमुद गृह विभाग शासन निर्णय दि.१४.१०.२०१३ अन्वये सदर प्रकल्पास व त्यासाठी येणाऱ्या संभाव्य रु. २२५ कोटी (रुपये दोनशे पंचवीस कोटी फक्त) इतक्या रक्कमेच्या खर्चाच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र. ३ येथे नमुद करारपत्रानुसार सदरहू कंपनीला देय असणारी रक्कम एकरकमी देय न करता, पुढील ६ वर्षाच्या कालावधीमध्ये (म्हणजेच प्रकल्प कार्यान्वित झाल्यावर २०% आणि उर्वरित ८०% रक्कम २० समान हप्त्यामध्ये) अदा करणे बंधनकारक आहे.

पुणे व पिंपरी चिंचवड सीसीटीव्ही प्रकल्पाचे काम पुर्ण झाले असुन सदर प्रकल्प दि.२७.१०.२०१५ रोजी कार्यान्वित (Go-Live) झाला आहे. सल्लागार कंपनी मे.पीडब्ल्युसी यांच्या संदर्भ क्र. ७ येथे नमुद दि. ८.११.२०१६ रोजीच्या ई-मेल संदेशाद्वारे दिलेल्या अहवालानुसार प्रकल्पाच्या झालेल्या कामाची एकूण किंमत रु. ) -/२१४,३८,५१,१२५अक्षरी रुपये दोनशे चौदा कोटी अडतीस लाख एक्कावन हजार एकशे पंचवीस फक्त) एवढी असल्याचे पीडब्ल्युसी ने प्रमाणीत केले आहे. आजपर्यंत मे. अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. या कंपनीला पुणे सीसीटीव्ही प्रकल्पाच्या केलेल्या कामासाठी एकूण रु. ६१,१९,६९,८११/- (अक्षरी रुपये एकसष्ट कोटी एकोणवीस लाख एकोणसत्तर हजार आठशे अकरा फक्त) एवढी रक्कम अदा करण्यात आलेली आहे. सल्लागार पीडब्ल्युसी कंपनीने पुणे सीसीटीव्ही प्रकल्पाच्या विनंती प्रस्तावातील (Request for proposal) तरतुदी व सेवा कराराच्या अटी व शर्ती प्रमाणे दि. ८.११.२०१६ रोजी सादर केलेल्या अहवालानुसार पुणे व पिंपरी चिंचवड शहरामध्ये सीसीटीव्ही प्रकल्पासाठी केलेल्या कामासाठी रु७,६६,९१,०१४./- (अक्षरी रुपये सात कोटी सहासष्ट लाख एक्यान्नव हजार चौदा फक्त) एवढी

रक्कम मे. अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. या कंपनीस चौथ्या तिमाही हप्त्याचे देयक म्हणून अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

मे. अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. आणि महाराष्ट्र शासन यांचे दरम्यान दि.२८.१०.२०१३ रोजी पुणे सीसीटीव्ही प्रकल्पाबाबत करार झाला आहे. सल्लागार पीडब्ल्युसी कंपनीच्या अहवालानुसार पुणे सीसीटीव्ही प्रकल्पाच्या केलेल्या कामासाठी मे. अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि. कंपनीला चौथ्या हप्त्याचे (Fourth Quarter) देयक म्हणुन रु७,६६,९१,०१४./-(अक्षरी रुपये सात कोटी सहासष्ट लाख एक्यान्नव हजार चौदा फक्त) एवढी रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदरहू, रक्कम आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, पुणे शहर यांना नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यास येत आहे. त्यांनी उपरोक्त रक्कमेचा धनादेश बँक ऑफ इंडीया, मुंबई ओवरसीज शाखा यांचेकडील **ESCROW Account No. 015020110000285 IFSC :BKID0000150** या खात्यावर जमा करावा.

३. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च हा "मागणी क्र. बी-१०, ४०५५- पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००)(०९) सीसीटीव्ही संनियंत्रण यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) योजनेतर योजना -५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि. २०.४.२०१६ ला अनुसरुन प्रशासकीय विभागाला असलेलया अधिकारान्वये तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र. क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु.क्र. ४, नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११७१६२७५०९०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kailas Arjun Gaikwad

Digitally signed by Kailas Arjun Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kailas Arjun Gaikwad
Date: 2016.11.17 16:29:45 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव
५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. पोलीस आयुक्त, पुणे शहर, पुणे
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१०. आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे
११. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पुणे
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१४. मे.अलाईड डिजिटल सर्व्हिसेस लि., प्रिमाईसेस नं. १३-ए, १३ वा मजला, अर्नेस्ट हाऊस, बॅकबे रेक्लेमेशन, एनसीपीए रोड, ब्लॉक III, नरीमन पाईंट, मुंबई-२१.
१५. वित्त विभाग, व्यय-७/ वित्तीय सुधारणा.
१०. अवर सचिव, अर्थ-२ ,गृह विभाग.
११. निवडनस्ती, पोल-३.

****